

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

मुख्य इमारत, पहिला मजला, मादाम काम मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh२-rfd@mah.gov.in

**क्रमांक: गौखनी-४२/०१२३/प्र.क्र.१६/ख-२** दिनांक १३ मार्च, २०२४

**विषय : गौण खनिज-नांदेड**

सन २०२१-२०२२ करीता मौजे माचनूर-७, ता.बिलोली, जि. नांदेड या वाळूगटाची रक्कम परत करणेबाबत.

**-श्री. शिवाजी बाजीराव शिंदे.**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, नांदेड यांना उपरोक्त विषयास अनुलक्षून असे कळविण्याचे मला निदेश आहेत की. सन २०२१-२०२२ करीता मौजे माचनूर-७, ता.बिलोली, जि. नांदेड येथील वाळूगट श्री. शिवाजी बाजीराव शिंदे, रा.चिंचाळा, पो.ता.उमरी, जि. नांदेड यांना रु. ४४,०३,४००/- इतक्या सर्वोच्च बोलीच्या रकमेस मंजूर करण्यात आला.

सदर वाळूगटाची लिलावाची संपूर्ण रक्कम लिलावधारक यांनी शासनजमा केली. तथापि, लिलावधारक यांनी दिनांक ०१.०५.२०२२ च्या पत्रान्वये "अचानक तब्येत बिगडल्यामुळे डॉक्टरच्या सल्ल्यानुसार आरामाची आवश्यकता असून मानसिक स्थिती बरोबर नाही त्यामुळे बॅक गॅरंटी व इतर रकमा भरू शकत नसल्याने, तब्येत सुधारल्यानंतर सदर वाळूघाट चालविण्यास परवानगी देण्याबाबत जिल्हाधिकारी, नांदेड यांना विनंती केली. तथापि, अपर जिल्हाधिकारी, नांदेड यांनी लिलावाच्या उर्वरीत रकमा शासनास अदा करण्यास कळविण्यात येवूनही सर्वोच्च बोलीच्या रकमे व्यतीरिक्त इतर रकमा शासनास जमा न केल्याने अपर जिल्हाधिकारी, नांदेड यांनी दिनांक १४.१०.२०२२ च्या आदेशान्वये लिलावधारक श्री. शिवाजी बाजीराव शिंदे, रा. चिंचाळा ता.उमरी यांनी मी.माचनुर-७ ता.बिलोली या रेतीघाटाच्या लिलावात लिलावात भाग घेतांना भरणा केलेली २५% अनामत रक्कम रुपये ०८,६०,८५०/- लिलावाच्या दिवशीच भरणा करणे अपेक्षित असलेली सर्वोच्च बोली व हातच्या किमतीतील फरकाची रक्कम रु. ०२,४०,०००/- तसेच ७५% रक्कम रुपये ३३,०२,५५०/- असे एकुण रु.४४,०३,४००/- रक्कम जप्त करण्यात येवून सदर वाळू घाटाची लिलाव प्रक्रीया रद्द केली

०२. लिलावधारक यांनी अपर जिल्हाधिकारी, नांदेड यांनी दिनांक १४.१०.२०२२ चे अपर विभागीय आयुक्त क्रमांक १, औरंगाबाद यांच्याकडे अव्हानित करण्यात आले असता, अपर विभागीय आयुक्त क्रमांक १, औरंगाबाद यांनी दिनांक २६.१२.२०२२ च्या आदेशान्वये अपर जिल्हाधिकारी, नांदेड यांचे दिनांक १४.१०.२०२२ चे आदेश कायम केले. तदनंतर लिलावधारक यांनी अपर विभागीय आयुक्त, क्रमांक-१, औरंगाबाद यांचे दिनांक २६.१२.२०२२ चे आदेश मा.मंत्री(महसूल) यांच्याकडे अव्हानित केले असता, मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक ०७.०६.२०२३ च्या आदेशान्वये अपर विभागीय आयुक्त, क्रमांक-१, औरंगाबाद यांचे दिनांक २६.१२.२०२२ चे आदेश रद्द करून वाळूगटाच्या सर्वोच्च बोलीच्या शासनास जमा केलेल्या ¼ व ¾ रकमा लिलावधारकास परत करण्याचे आदेश दिलेले आहेत.

०३. मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक ०७.०६.२०२३ रोजी दिलेले आदेशानुसार लिलावधारक यांनी वाळूगटाच्या सर्वोच्च बोलीच्या शासनास जमा केलेल्या ¼ व ¾ एकूण रकमा

रू.४४,०३,४००/- (फक्त चव्वेचाळीस लाख तीन हजार चारशे रूपये) लिलावधारकास परत करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे.

०४. सबब, श्री. शिवाजी बाजीराव शिंदे यांना एकूण रू.४४,०३,४००/- (फक्त चव्वेचाळीस लाख तीन हजार चारशे रूपये) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

०५. याबाबीवर होणारा खर्च सन २०२३-२०२४ वर्षाकरीता लेखाशिर्ष ०८५३ अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र. विअप्र-२०११/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दिनांक ०८.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१४५५३३२११९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2024.03.13 15:04:51 +05'30'

**( सदानंद.गो.मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, नांदेड.

**प्रत :**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २. नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- २, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक,कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) निवडनस्ती ख-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-३२.